**नियोजन व अंमलबजावणी धोरणात्मक प्रकल्प / कार्यक्रम व्यवस्थापन कक्ष (STRATEGIC PROJECT/ PROGRAMME MANAGEMENT UNIT) याअंतर्गत मे. ग्रॅण्ड थॉर्टन इंडिया एल.एल.पी. पुणे यांना माहे एप्रिल ते जून या कालावधीचे देयक अदा करण्याबाबत.**
**लेखाशीर्ष :२२०४-५६४४**

# महाराष्ट्र शासन

## शालेय शिक्षण व क्रीडा विभाग

**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण ३०२४/प्र.क्र.१३५/क्रीयुसे-१,**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ६ मार्च २०२५

वाचा :-

१) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय, क्र. क्रीडाधो-३११३/प्र.क्र.४६/क्रीयुसे-३, दिनांक २६ फेब्रुवारी, २०१४.

२) राज्य क्रीडा विकास समितीची दिनांक ०३ फेब्रुवारी, २०२३ रोजीची बैठक.

३) आयुक्त, क्रीडा व युवक संचालनालय, पुणे यांचे क्र. क्रीयुसे-PMU/निधी मागणी वितरण २०२४-२५/का-९, ५४१, दिनांक ७/६/२०२४ रोजीचा प्रस्ताव .

प्रस्तावना :-

क्रीडा विभागामार्फत राज्यातील क्रीडा सुविधाचे सर्वेक्षण करून, उपलब्ध माहिती संगणीकृत करुन जतन करण्यासाठी विशेष मोहिम हाती घेण्यात आली आहे. क्रीडा सुविधांची संख्या व त्यांचा वापर विचारात घेवून नव्याने क्रीडा सुविधा निर्माण करणे, जनतेला व खेळाडूंना राज्यातील क्रीडा सुविधांची माहिती उपलब्ध करणे आवश्यक असल्याने, त्याअनुषंगाने क्रीडा सर्वेक्षण करण्यास तसेच सदर सर्वेक्षणाकरीता व माहिती वेळोवेळी अद्ययावत करण्यासाठी क्रीडा संचालनालयात स्वतंत्र सेलची निर्मिती करण्यास संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेली आहे.

याअनुषंगाने तत्कालीन मा.मंत्री (क्रीडा व युवक सेवा) यांच्या अध्यक्षतेखाली दिनांक ०३.०२.२०२३ रोजी झालेल्या राज्य क्रीडा विकास समितीच्या बैठकीत राज्यातील क्रीडा विकासाच्या अनुषंगाने नियोजन व अंमलबजावणीसाठी धोरणात्मक प्रकल्प/कार्यक्रम व्यवस्थापन करण्यासाठी पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात आले आहेत :-

अ. राज्यातील क्रीडा विकासाच्या अनुषंगाने नियोजन व अंमलबजावणीसाठी धोरणात्मक प्रकल्प/कार्यक्रम व्यवस्थापन कक्ष (Strategic Project/ Program Management Unit) स्थापन करण्यास मान्यता देण्यात आली.

आ. याअनुषंगाने क्रीडा संचालनालयाच्या स्तरावर निविदा प्रक्रिया राबविण्यात यावी.

इ. धोरणात्मक प्रकल्प/कार्यक्रम व्यवस्थापन कक्ष स्थापन करण्यासाठी ३ वर्षाकरीता निविदा काढण्यात यावी.

ई. प्रथम एका वर्षाचे काम समाधानकारक असल्यास पुढील २ वर्षासाठी काम देण्यात यावे.

राज्य क्रीडा विकास समितीच्या उपरोक्त निर्णयांच्या अनुषंगाने क्रीडा संचालनालयाकडून धोरणात्मक प्रकल्प/कार्यक्रम व्यवस्थापन कक्ष स्थापन करण्यासाठी ई-निविदा प्रक्रिया राबवून, मे.ग्रॅन्ड थॉर्टन इंडिया एल.एल.पी. या संस्थेची प्रथम एका वर्षासाठी नेमणुक करुन त्यांना दरमहा रु.१३,२७,५००/- या दराने करण्यात आली आहे.

मे.ग्रॅन्ड थॉर्टन इंडिया एल.एल.पी., पुणे यांनी दिनांक १६ जून,२०२३ पासून काम सुरु केले आहे. त्यानुसार माहे जून २०२३ ते माहे मार्च २०२४ या कालावधीकरिता रु.१,२६,११,२५०/- इतके शुल्क सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात अदा करण्यात आले आहे.

आता माहे एप्रिल २०२४- ते १५ जून २०२४ पर्यंत एकूण देयक रक्कम (जीएसटीसह) ३३,१८,७५०.००/-अदा करण्यास आयुक्त, क्रीडा यांचे दि. ७/६/२०२४ रोजीच्या पत्रान्वये प्रस्ताव शासनास सादर केला आहे. त्यानुषंगाने आवश्यक निधी वितरीत करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :-</u>**

मे.ग्रॅन्ड थॉर्टन इंडिया एल.एल.पी. या संस्थेची प्रथम एका वर्षासाठी नेमणुक करुन त्यांना दरमहा रु.१३,२७,५००/- या दराने शुल्क अदा करण्यास मान्यता देण्यात आली आहे. सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरिता उपरोक्त संस्थेस दरमहा रु.१३,२७,५००/- या माहे एप्रिल २०२४- ते १५ जून २०२४ पर्यंत एकूण देयक रक्कम (जीएसटीसह) रु ३३,१८,७५०.००/-( अक्षरी रु. तेहतीस लाख अठरा हजार सातशे पन्नास फक्त) अदा करण्यास इतके शुल्क अदा करण्यास पुढील अटींच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे:-

I. उपरोक्त निधी आवश्यकतेनुसार मान्य निकषानुसार खर्च करण्यात यावा. ज्यावेळेस निधी प्रत्यक्ष खर्च करावयाचा त्याच वेळी आंहरीत करावा. शासन लेख्याबाहेर बँक खात्यात हा निधी ठेऊ नये.

II. राज्य शासनामार्फत वेळोवेळी वित्त विषयक निर्गमित करण्यात आलेले विविध आदेश/नियम/ शासन निर्णय वित्तीय नियमावली यांची अंमलबजावणी करण्यात यावी.

III. निधी ज्या प्रयोजनाकरिता मंजूर करण्यात आला आहे , त्या प्रयोजनार्थ खर्च करण्यात यावा.

IV. निधीचा विनियोग झाल्यानंतर उपयोगिता प्रमाणपत्र सादर करण्यात यावे. निधीच्या विनियोगाबाबत उपयोगिता प्रमाणपत्र सादर करण्यात यावे.

४. सदर प्रयोजनार्थ होणारा खर्च मागणी क्र.ई-३, मुख्य लेखाशिर्ष, २२०४, क्रीडा व युवक सेवा, १०४, क्रीडा व खेळ, (३३), क्रीडा विद्यापीठ व क्रीडा अकादमी (३३) (०१), पंचवार्षिक योजनांतर्गत योजना (३९) राज्यातील क्रीडा सुविधांचे सर्वेक्षण, ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर), संगणक क्र.२२०४-५६४४ खाली सन २०२४-२५ या आर्थिक वर्षासाठी मंजूर अर्थसंकल्पीय तरतूदीमधून भागविण्यात यावा.

५. सदर आदेश नियोजन विभाग, अनौपचारिक संदर्भ क्र.८२६ /१४७१, दिनांक १४.२.२०२५ व वित्त विभाग, अनौपचारिक संदर्भ क्र. १३१५ /व्यय-५, दिनांक २०/२/२०२५ अन्वये मिळालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

६. यासाठी लेखाधिकारी, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी व आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३०६१५०९०२३१२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RANSING
ANANDRAO DERE

Digitally signed by RANSING ANANDRAO DERE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT,
2.5.4.20=9651a3c25d5e1f106e47059f72760ff520f9b00f67c3e9186e40ed4bd4fbaee6, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=41EC78BC14804BABDC24C7FD31BA9FBF63804F499D4335774E27423E40136397, cn=RANSING ANANDRAO DERE
Date: 2025.03.06 15:09:52 +05'30'

**( रणसिंग डेरे )**
**कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपालांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय,मुंबई
३. मा.उपमुख्यमंत्री ( नगर विकास व गृहनिर्माण ) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय,मुंबई
४. मा.उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय,मुंबई
५. मा.मंत्री, क्रीडा व युवक कल्याण, यांचे खाजगी सचिव,
६. मा.विरोधी पक्षनेता (विधानसभा / विधानपरिषद) यांचे स्वीय सहायक, मुंबई.
७. सर्व विधानसभा / विधानपरिषद सदस्य यांचे स्वीय सहायक.
८. अपर मुख्य सचिव,(अ.का क्रीडा विभाग) , मंत्रालय, यांचे स्वीय सहायक. मुंबई-४०० ०३२,
९. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे,
१०. महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ - मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर,
११. महालेखापाल (लेखा), महाराष्ट्र-१ - मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर
१२. अधिदान व लेखाधिकारी, पुणे (क्रीडा संचालनालयामार्फत)
१३. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे (क्रीडा संचालनालयामार्फत)
१४. वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे. (क्रीडा संचालनालयामार्फत)
१५. उपसंचालक, क्रीडा संचालनालय , पुणे
१६. वित्त विभाग (व्यय-५)/अर्थ-८/नियोजन विभाग (का.१४७१), मंत्रालय, मुंबई,
१७. कार्यासन अर्थसंकल्प, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई,
१८. निवड नस्ती (क्रीयुसे-१).